शासन सेवेत सरळसेवेने नियुक्तीसाठी राज्यातील प्राविण्यप्राप्त खेळाडूंच्या कमाल वयोमर्यादेत दि.३१ डिसेंबर २०२३ पर्यंत शिथिलता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- खेआक्ष-२९२३/प्र.क्र.५७/क्रीयुसे-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०७ जून, २०२३

वाचा :- १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र.राक्रीधो-२०२२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक ०१/०७/२०१६
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.सनिव- २०२३/प्र.क्र.१४/कार्या १२, दिनांक ०३/०३/२०२३

**प्रस्तावना :-**

विविध शासकीय विभागात व शासनाच्या मालकीच्या व नियंत्रणाखाली असलेल्या महामंडळात, स्थानिक प्राधिकरणात व शासकीय सवलती प्राप्त केलेल्या संस्थांमध्ये नोकरीसाठी अत्युच्च गुणवत्ताप्राप्त खेळाडूंकरिता ५% आरक्षण ठेवण्यात आलेले आहे. याकरिता संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार सर्वसमावेशक सूचना देण्यात आलेल्या आहेत. सामान्य प्रशासन विभागाद्वारे संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयानुसार दि.३१.१२.२०२३ पर्यंत प्रसिद्ध होणाऱ्या जाहिरातींसाठी विहित केलेल्या कमाल वयोमर्यादेत २ वर्षे इतकी शिथिलता देण्यात आली आहे. या पार्श्वभूमीवर राज्यातील प्राविण्यप्राप्त खेळाडूंना शासन सेवेत सरळसेवेने नियुक्तीसाठीच्या प्रसिद्ध होणाऱ्या सर्व जाहिरातींकरिता कमाल वयोमर्यादेत शिथिलता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन सेवेत सरळसेवेने नियुक्तीसाठीच्या प्रसिद्ध होणाऱ्या सर्व जाहिरातींकरिता राज्यातील प्राविण्यप्राप्त खेळाडूंच्या कमाल वयोमर्यादेबाबत खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:-

१) या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ते दि. ३१ डिसेंबर, २०२३ पर्यंत शासकीय सेवेत सरळसेवेने नियुक्तीसंदर्भात प्रसिद्ध होणाऱ्या सर्व जाहिरातींकरिता अर्ज करणाऱ्या राज्यातील प्राविण्यप्राप्त खेळाडूंसाठी संदर्भ क्र.१ येथील दि.०१/०७/२०१६ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या कमाल वयोमर्यादेत दोन वर्षे इतकी शिथिलता देण्यात येत आहे.

२) सदर शासन निर्णयाच्या दिनांकापूर्वी जाहिराती प्रसिध्द झालेल्या आहेत तथापि अद्याप उमेदवारांनी अर्ज सादर करण्याची मुदत संपलेली नाही, अशा सर्व जाहिरातींसाठी देखील वरील कमाल वयोमर्यादेतील शिथिलता लागू राहील. त्यानुसार संबंधित जाहिरातीच्या

अनुषंगाने कमाल वयोमर्यादेत शिथिलता दिल्याने पात्र ठरलेल्या उमेदवारांना अर्ज सादर करण्यासाठी आवश्यकतेनुसार पुरेशी मुदतवाढ देण्यात यावी.

३) दि.३१ डिसेंबर, २०२३ नंतर प्रसिध्द होणाऱ्या जाहिरातीसाठी अर्ज करणाऱ्या राज्यातील प्राविण्यप्राप्त खेळाडूंसाठी संदर्भ क्र.१ येथील दि.०१/०७/२०१६ च्या शासन निर्णयात विहित केलेली कमाल वयोमर्यादाच लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०७१६३१५४१७२१ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार,

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2023.06.08 15:05:39 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव,
३) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
४) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) सर्व मंत्रालयीन विभाग,
६) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७) सर्व जिल्हाधिकारी,
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
९) सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील कार्यालय/विभाग प्रमुख,
१०) निवडनस्ती क्रीयुसे-२.